**+२ स्तरावरील द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या नवीन/ अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यांस मान्यता देणेबाबत....**

महाराष्ट्र शासन
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक व्हीओसी २००९/(१४२ /०९)/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ जुलै २००९

**संदर्भ :** १) शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.व्हीओसी-२००८/(५८/०८)/व्यशि-३, दिनांक २६/५/२००८.

२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.व्हीओसी-२००८/(५८/०८)/व्यशि-३, दिनांक २३/६/२००८.

३) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक ८/व्हीओसी/२००९/९५० दिनांक ०७.०७. २००९.

४) उपायुक्त ( शिक्षण ) एफ/दक्षिण महापालिका विभाग कार्यालय, तिसरा मजला, डॉ. आंबेडकर मार्ग, परळ, मुंबई १२ यांनी संचालक ( व्यवसाय शिक्षण ) यांना पाठविलेले व शासनास पृष्ठांकित केलेले पत्र क्रमांक उपायुक्त ( शिक्षण )/१६६७, दिनांक ४.७.२००९.

५) शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.व्हीओसी-२००९/(५/०९)/व्यशि-४, दिनांक ०९/७/२००९.

६) शासन निर्णय शालेय शिक्षण विभाग, क्र नमाशा २००९/(४९७/०९)/माशि-१ दिनांक ११/६/२०९८.

७) शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.व्हीओसी-२००९/(१४२ /०९)/व्यशि-४, दिनांक १७जुलै २००९

८) शिक्षणाधिकारी बृहन्मुंबई महानगर पालिका शिक्षणाधिकारी यांचे कार्यालय, हिंदू कॉलनी, दादर (पूर्व) मुंबई यांचे पत्र क्रमांक आइओ/२९८४,दिनांक २०.७.२००९.

**<u>प्रस्तावना :-</u>** बृहन्मुंबई महानगर पालिकेने १) दिक्षित रोड, म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, विलेपार्ले (पूर्व) मुंबई २) भवानी शंकर म.न.पा. विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, दादर (पश्चिम) मुंबई आणि ३) रतनबाई म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, मुलुंड (पश्चिम) मुंबई ही तीन महाविद्यालये जुलै २००९ पासून सुरु करण्याचा निर्णय घेतला. या कनिष्ठ महाविद्यालयामध्ये इलेक्ट्रॉनिक्स व कॉम्प्युटर सायन्स हे व्दिलक्षी अभ्यासक्रमातील अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्याबाबतची बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून संदर्भाधिन क्रमांक ४ च्या पत्रान्वये मागणी करण्यात आली होती. प्र. संचालक ( व्यवसाय शिक्षण ) यांनी संदर्भाधिन क्रमांक ३ च्या पत्रान्वये सदर प्रस्ताव शासनाकडे सादर केला होता त्या अनुषंगाने संदर्भाकित क्रमांक ७ दिनांक १७ जुलै, २००९ च्या शासन निर्णयान्वये व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमासाठी आवश्यक असलेल्या पायाभूत सुविधा तसेच विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तीची पुर्तता करीत असतील तर प्रपत्रामध्ये नमूद करण्यात आलेल्या बृहन्मुंबई महानगर पालिकेच्या कनिष्ठ महाविद्यालयांना द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या नविन तुकडया कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर शैक्षणिक वर्ष २००९-२०१० पासून सुरू करण्यास अटीं व शर्तीच्या अधिन राहून एक विशेष बाब म्हणून शासनाची मान्यता देण्यात आली . शिक्षणाधिकारी बृहन्मुंबई महानगर पालिका यांनी संदर्भाकित क्रमांक ८ च्या पत्रान्वये उपरोक्त ३ कनिष्ठ महाविद्यालयांना आता संगणक विज्ञान व इलेक्ट्रिक मेन्टनन्स या अभ्यासक्रमाच्या प्रत्येकी २ तुकडया मंजूर करण्याची विनंती केली आहे.म्हणून दिनांक १७ जुलै, २००९ च्या संदर्भाकित क्रमांक ७ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन आता पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

२. डॉ. कोठारी आयोगाच्या १९६४ च्या शिफारशीनुसार अधिकाधिक युवकांना विविध व्यवसायांचे प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने १९७८-७९ पासून राज्यात व्यवसाय विषयांची ३०% व्याप्ती असलेले, +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यांत आले. सद्यस्थितीत तांत्रिक/वाणिज्य/कृषी/मत्स्य या गटातील एकूण १६ द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राज्यातील शासकीय/अशासकीय संस्थांमध्ये राबविण्यांत येत आहे.

३. बृहन्मुंबई महानगर पालिकेने १) दिक्षित रोड, म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, विले पार्ले (पूर्व) मुंबई २) भवानी शंकर म.न.पा. विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, दादर (पश्चिम) मुंबई आणि ३) रतनबाई म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, मुलुंड (पश्चिम) मुंबई ही तीन महाविद्यालये जुलै २००९ पासून सुरु करण्याचा निर्णय घेतला आहे. या कनिष्ठ महाविद्यालयामध्ये कॉम्प्युटर सायन्स व इलेक्ट्रिक मेन्टनन्स हे व्दिलक्षी अभ्यासक्रमातील अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्याबाबतची बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून संदर्भाधिन क्रमांक ८ च्या पत्रान्वये मागणी करण्यात आली आहे.

४. +२ स्तरावरील द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या नवीन/ अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यांस मान्यता देणेबाबतचे प्रस्ताव सादर करण्याची अंतिम मुदत दिनांक ३० जून २००९ पर्यत होती.तथापि बृहन्मुंबई महानगरपालिकेने महानगरपालिकेच्या शाळातून शिक्षण घेतलेल्या अल्प उत्पन्न गटातील गुणवंत विद्यार्थ्याचे भवितव्य घडविण्यासाठी कनिष्ठ महाविद्यालये सुरू करण्याचा निर्णय घेतला ही बाब विचारात घेवून, व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमासाठी आवश्यक असलेल्या पायाभूत सुविधा तसेच विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तींची (१) दिक्षित रोड, म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, विले पार्ले (पूर्व), मुंबई (२) भवानी शंकर म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, दादर (पश्चिम), मुंबई आणि (३) रतनबाई म.न.पा.विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, मुलुंड (पश्चिम), मुंबई ही तीन विज्ञान कनिष्ठ महाविद्यालये पूर्तता करीत असतील तर त्यांना चालु शैक्षणिक वर्ष २००९-१० पासून कॉम्प्युटर सायन्स व इलेक्ट्रिक मेन्टनन्स या व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या प्रत्येकी दोन तुकडया (प्रति तुकडी ५० प्रवेश क्षमता) सुरु करण्यास विशेष बाब म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -** व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमासाठी आवश्यक असलेल्या पायाभूत सुविधा तसेच विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तींची पुर्तता करीत असतील तर खालील प्रपत्रामध्ये नमूद करण्यात आलेल्या बृहन्मुंबई महानगर पालिकेच्या कनिष्ठ महाविद्यालयांना द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या नविन तुकडया **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** शैक्षणिक वर्ष २००९-२०१० पासून सुरू करण्यास खालील अटीं व शर्तींच्या अधिन राहून एक विशेष बाब म्हणून शासनाची मान्यता देण्यांत येत आहे.

**प्रपत्र**

| विभाग | जिल्हा | अ. क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | अभ्यासक्रमाचे नाव | मंजूर तुकडयाची संख्या (प्रती तुकडी प्रवेश क्षमता ५० विद्यार्थी) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मुंबई | मुंबई शहर | १ | भवानी शंकर म.न.पा. विज्ञान महाविद्यालय, दादर, (प.), मुंबई | इलेक्ट्रिक मेन्टेनन्स | २ |
| | मुंबई उप-नगर | १ | दिक्षित रोड म.न.पा. कनिष्ठ महाविद्यालय, विलेपार्ले (पूर्व), मुंबई . | कॉम्प्युटर सायन्स , | २ |
| | | २ | रतनबाई म.न.पा. कनिष्ठ महाविद्यालय, मुंलुंड (प.), मुंबई . | इलेक्ट्रिक मेन्टेनन्स | २ |

**अटी व शर्ती**

१. सबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहिता १९८१ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यांस कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यांत येणार नाही.

३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्या कडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.

५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम "** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता याचा उल्लेख करण्यात यावा.

६. मान्यतेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा एक महिन्याच्या कालावधीमध्ये उपलब्ध करणे बंधनकारक राहील.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यांत आल्याभुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा/वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यांत यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत, किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यांत यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यांत आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी ५० असून, शैक्षणिक वर्ष २००९-२०१० मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर अभ्यासक्रमाची तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. संबंधित संस्थेने त्यांच्याकडे भाषा / जीवशास्त्र इत्यादी विषयांचे शिक्षक आता मंजूर केलेल्या व्दिलक्षी अभ्यासक्रमाच्या तुकडीमूळे अतिरीक्त ठरणार नाहीत याची खातरजमा करुनच विद्यार्थ्यांना प्रवेश दयावा.

१४. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नवीन अटी व शर्ती अंतर्भूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

हा शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणकीय सांकेतांक क्र. 200908011614001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(शोभा वि. पत्की)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत

१) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१ यांना आवश्यक त्या कार्यवाही साठी अग्रेषित.
२) प्रभारी सहसंचालक ( व्यवसाय शिक्षण ) प्रादेशिक कार्यालय, मुंबई
३) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी मुंबई / मुंबई उपनगर
४) उपायुक्त ( शिक्षण ) एफ/दक्षिण महापालिका विभाग कार्यालय, तिसरा मजला, डॉ. आंबेडकर मार्ग, परळ, मुंबई १२
५) संबंधित संस्थांचे प्राचार्य (व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
६) निवडनस्ती (व्य.शि. ४ )